शैक्षणिक वर्ष २०१० -११
अस्तित्वात असलेल्या महाविद्यालयात
अतिरिक्त तुकड्यांना मान्यता (तिसरी यादी)

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
शासन आदेश क्रमांक एनजीसी २०१०/(२२६/१०)/मशि-४
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १५ जुलै, २०१०

**पहा**:- १) शासन निर्णय क्रमांक-एनजीसी २०१० / (७/१०) / मशि-४,
दि.१५.१.२०१०, व दि. ३.४.२०१० (Task Force)
२) शासन पत्र क्रमांक-एनजीसी २०१० / (७/१०) / मशि-४,
दि.१५.३.२०१०, (Task Force)
३) संचालक, उच्च शिक्षण यांचे पत्र क्र. अमवि २०१०/कोवि/ प्रस्ताव १०-११/
अ.क.ड. / मवि २-३ / १७४० दिनांक १९.६.२०१०

**शासन आदेश**

महाराष्ट्र विद्यापीठ अधिनियम, १९९४ मधील कलम ८२(४) नुसार राज्यातील विद्यापीठांनी अस्तित्वात असलेल्या महाविद्यालयात अतिरिक्त तुकडी मान्यतेसाठी शासनाकडे प्रस्ताव सादर करावयाचे असतात, त्यानुसार शैक्षणिक वर्ष २०१०-११ साठी राज्यातील विद्यापीठांकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावांची अनुक्रमे शासन निर्णय व शासन पत्र क्रमांक-एनजीसी २०१०/ (७/१०) / मशि-४, दि. १५.१.२०१०, दि. ३.४.२०१० व दि. १५.३.२०१० अन्वये स्थापित कृतिसमितीद्वारे छाननी करण्यात आली. कृती समितीचे अभिप्राय / शिफारशी व विद्यापीठाच्या शिफारशी विचारात घेऊन महाराष्ट्र विद्यापीठ अधिनियम १९९४ मधील कलम ८२(५) व ८३(५) अन्वये शासनास प्राप्त अधिकारानुसार अस्तित्वात असलेल्या महाविद्यालयात पुढील विवरणात नमूद केल्यानुसार अतिरिक्त तुकड्यांना खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून **कायम विना अनुदान तत्वावर** मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | संस्थेचे / महाविद्यालयाचे नाव | मान्यता दिलेल्या अतिरिक्त तुकड्या |
|---|---|---|
| | **मुंबई विद्यापीठ, मुंबई** | |
| १. | टिळक एज्युकेशन सोसायटीचे टिळक कला आणि वाणिज्य महाविद्यालय, प्लॉट नं १३१, सेक्टर-२८, वाशी, नवी मुंबई | १.एफ.वाय बी. एस्सी. (कॉम्प्युटर सायन्स)-(१ बॅच)<br>२. एफ.वाय.बी.कॉम-१<br>३. एफ. वाय. बी.एस्सी. (आय. टी.)-१<br>४. एफ. वाय. बी.एम.एस.-१<br>(प्रत्येकी १ अतिरिक्त तुकडी) |
| २. | बंट्स संघाचे एस. एम. शेट्टी कॉलेज ऑफ सायन्स कॉमर्स ॲन्ड मॅनेजमेंट स्टडीज, एस. एम. शेट्टी हायस्कूल आणि ज्यु. कॉलेज, हिरानंदानी कॉम्प्लेक्स जवळ, कोपरी, पवई, मुंबई ७६ | एफ. वाय. बी.एम.एस.-<br>(१ अतिरिक्त तुकडी) |
| ३. | साठे महाविद्यालय, विलेपार्ले (पू.), मुंबई ५७ | एम.एस्सी. (आय. टी.)<br>(१ अतिरिक्त तुकडी) |

| | | |
|---|---|---|
| ४. | लेट विष्णू वामन ठाकूर चॅरिटेबल ट्रस्टचे भास्कर वामन ठाकूर कॉलेज ऑफ सायन्स, यशवंत केशव पाटील कॉलेज ऑफ कॉमर्स, विद्या दयानंद पाटील कॉलेज ऑफ आर्टस्, एम. बी. इस्टेट, विवा कॉलेज रोड, विरार, ता. वसई, जि. ठाणे | १. एफ.वाय.बी.एम.एम. (१ तुकडी)<br>२. एफ.वाय.बी.कॉम. (४ तुकड्या)<br>३. एफ. वाय.बी.एम.एस. (१ तुकडी) |
| ५. | विद्या विकास एज्युकेशन सोसायटीचे कला, वाणिज्य, विज्ञान आणि बी.एम.एम., बी.एम.एस. महाविद्यालय, आय. बी. पटेल म्युनिसिपल स्कुल, गोरेगांव (प.), मुंबई ६२ | १. एफ. वाय.बी. कॉम (२ तुकड्या)<br>२. एफ. वाय. बी.एम.एस. (२ तुकड्या)<br>३. एफ.वाय.बी.एम.एम. (२ तुकड्या) |
| ६. | प्रज्ञा करुणा बहूउददेशिय शिक्षण संस्था, कला, वाणिज्य आणि विज्ञान महाविद्यालय, कल्याण (पुर्व). | १. एफ.वाय.बी.कॉम.-१ तुकडी<br>२. एफ.वाय. बी.ए. -१ तुकडी |
| ७. | प्रभाकर पाटील एज्युकेशन सोसायटीचे कला, वाणिज्य, विज्ञान महाविद्यालय, वेशवी, अलिबाग, जि. रायगड | एफ.वाय.बी.ए. -१ तुकडी |
| | **पुणे विद्यापीठ** | |
| ८. | एम. आय.टी.आर्टस कॉमर्स ॲण्ड सायन्स कॉलेज, देहू फाटा आळंदी देवाची, पुणे ४१२ १०५ | १. बी. एस्सी कॉम्प्युटर सायन्स वर्ष पहिले (१ अतिरिक्त तुकडी)<br>२. एम.एस्सी. कॉम्प्युटर सायन्स वर्ष पहिले (१ अतिरिक्त तुकडी) |
| ९. | कॉलेज ऑफ कॉमर्स, सायन्स ॲन्ड इन्फॉरमेशन टेक्नॉलॉजी चिंचवड, पुणे, एस.टी.पी. बिल्डींग पूर्णानगर कॉम्प्लेक्स, चिखली रोड, चिंचवड, पुणे ४११ ०१९. | १. एम.सी.ए. वर्ष पहिले (१ अतिरिक्त तुकडी)<br>२. बी.एस्सी. कॉम्प्युटर सायन्स वर्ष पहिले (२ अतिरिक्त तुकड्या )<br>३. एम. एस्सी. कॉम्प्युटर सायन्स वर्ष पहिले (१ अतिरिक्त तुकडी) |
| | **राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ, नागपूर** | |
| १०. | इंदिरा कॉलेज ऑफ सायन्स ॲण्ड मॅनजमेंट, चंद्रपूर | १. बी.एफ.डी. भाग १<br>२. बी.लिब. भाग १<br>३. बी. कॉम.(कॉम्प्यु. ॲप्लिकेशन) भाग १<br>४. एम.सी.एम. भाग १<br>(प्रत्येकी १ अतिरिक्त तुकडी) |
| ११. | सेंटर पॉईट कॉलेज, ७ नवाब ले-आऊट, तिलक नगर, नागपूर-१० | १.बी. कॉम (कॉम्प्यु. अप्लिकेशन) भाग- १<br>२. बी.बी.ए. भाग -१<br>(प्रत्येकी १ अति. तुकडी) |
| १२. | चिंतामणी महाविद्यालय, घुग्घुस, ता. जि. चंद्रपूर | बी.ए. भाग १ (१ तुकडी) |
| १३. | विद्याभारती कॉलेज, तुमसर, जिल्हा भंडारा | १. बी. एफ.डी. भाग १<br>२. पी.जी.डी.सी.सी.ए.<br>(प्रत्येकी १ अतिरिक्त तुकडी) |
| १४. | विद्यानिकेतन कॉलेज, बेसा, नागपूर | डी.एच.एन.टी. भाग १<br>(१ अतिरिक्त तुकडी) |
| १५. | न्यू आर्टस् कॉमर्स ॲण्ड सायन्स कॉलेज, वर्धा | डिप्लोमा इन हार्डवेअर ॲण्ड नेटवर्कींग टेक्नॉलॉजी (१ अतिरिक्त तुकडी) |

| | | |
|---|---|---|
| **डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद** | | |
| १६. | न्यु. कोहीनूर कला, वाणिज्य व विज्ञान महाविद्यालय, चौका, ता. जि. औरंगाबाद | १. बी.ए. प्रथम वर्ष<br>२. वाणिज्य प्रथम वर्ष<br>३. विज्ञान प्रथम वर्ष<br>(प्रत्येकी १ अतिरिक्त तुकडी) |
| १७. | न्यु. कोहीनूर कला, वाणिज्य व विज्ञान महाविद्यालय, खुल्ताबाद, ता. खुल्ताबाद, जि. औरंगाबाद | १. बी.ए. प्रथम वर्ष<br>२. वाणिज्य प्रथम वर्ष<br>३. विज्ञान प्रथम वर्ष<br>(प्रत्येकी १ अतिरिक्त तुकडी) |
| **स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड** | | |
| १८. | कॉलेज ऑफ कॉम्प्युटर सायन्स इम्फॉरमेशन टेक्नॉलॉजी, अंबाजोगाई रोड, लातूर | १. बी. एस्सी. (एस. ई.)<br>२. एम. एस्सी. (एस.ई.) ऐवजी एम.एस्सी. (सी.एस.)<br>३. एम. एस्सी ( सॅन)<br>(प्रत्येकी १ अतिरिक्त तुकडी |
| १९. | श्री. स्वामी समर्थ बी.सी.ए. महाविद्यालय, औंढा नागनाथ, जि. हिंगोली | बी.सी.ए. (१ अतिरिक्त तुकडी) |

**अटी व शर्ती:-**

I. अस्तित्वात असलेल्या ज्या महाविद्यालयात अतिरिक्त तुकड्या मंजूर करण्यात आलेल्या आहेत, किंवा बदली तुकडी दिली आहे त्या महाविद्यालयाने त्यांच्या विभागीय सहसंचालकांकडे ते भविष्यात कोणत्याही परिस्थितीत अनुदानाची मागणी करणार नाहीत असे हमीपत्र रु. १००/- च्या नॉन ज्युडीशियल स्टँप पेपरवर सादर करावे.

II. संबंधित विभागीय सहसंचालकांचे हमीपत्र सादर केल्याविषयीचे प्रमाणपत्र प्राप्त झाल्याशिवाय विद्यापीठाने संलग्नतेची प्रक्रिया सुरु करु नये.

III. विद्यापीठाने विहित केलेल्या निकषानुसार व विद्यापीठ अनुदान आयोगाने विहित केलेल्या शैक्षणिक पात्रतेनुसार महाविद्यालयांनी, अध्यापक वर्ग/ कर्मचारी वर्ग नेमणे आवश्यक असून इतर सर्व आवश्यक पायाभूत सोयी उपलब्ध कराव्यात व त्याची खात्री विभागीय सहसंचालकानी ३० ऑगस्ट पर्यंत करावी व तदूनंतरच उपरोक्त अट क्रमांक २ मधील प्रमाणपत्र विद्यापीठास द्यावे.

IV. विद्यापीठ अनुदान आयोगाच्या युजीसी ( ॲफिलिएशन ऑफ कॉलेजेस बाय युनीव्हर्सीटीज) रेग्युलेशन, २००९ मध्ये महाविद्यालयांना संलग्नीकरण देण्याबाबत विहीत केलेल्या निकषांची पुर्तता केल्याशिवाय संबंधित महाविद्यालयांना संलग्नीकरण देण्याची कार्यवाही विद्यपीठाने करु नये.

V. महाविद्यालयांने कोणत्याही परिस्थितीत मंजूर प्रवेश क्षमतेपेक्षा जास्त प्रवेश देऊ नयेत.

VI. नवीन तुकडया मंजूर करण्यात आलेल्या महाविद्यालयांनी सन २०१०-११ व २०११-१२ मध्ये NAAC ॲक्रीडीएशन प्राप्त करुन घ्यावे व ते या कालावधीत न मिळविल्यास सदर अतिरिक्त तुकडीची मान्यता आपोआप रद्द होईल.

VII. महाराष्ट्र विद्यापीठ कायदा १९९४ मधील कलम ८२ (५) व ८३(५) नुसार ही मान्यता शैक्षणिक वर्ष २०१०-११ साठी देण्यात येत आहे. ही मान्यता फक्त शैक्षणिक वर्ष २०१०-११ पूरतीच मर्यादित राहील. याचर्षी अतिरिक्त तुकडी सुरु न केल्यास ही मान्यता आपोआप रद्द होईल.

२. विद्यापीठाचे संलग्निकरण देण्याबाबत आवश्यक असलेली पुढील कार्यवाही विद्यापीठांनी करण्यापूर्वी शासनाच्या मान्यतेबाबतचे आदेश शासनाच्या संकेतस्थळावर अवलोकन केल्याशिवाय व विभागीय सहसंचालकाचे प्रमाणपत्र मिळाल्याशिवाय संलग्नता देण्याची प्रक्रिया सुरु करु नये. विद्यापीठांनी संलग्नतेबाबतचा पूर्तता अहवाल संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे व संबंधित विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य यांना पाठवावा.

३. संबंधीत विद्यापीठांनी व विभागीय सहसंचालकांनी अतिरिक्त तुकड्यांबाबतचा नियतकालिक आढावा घेवून सदर अतिरिक्त तुकडीसाठी मंजूर विद्यार्थी संख्येच्या ५० टक्के किंवा त्यापेक्षा कमी विद्यार्थी दिसून आल्यास सदर अतिरिक्त तुकडी रद्द समजून तसे शासन व विद्यापीठाच्या माहितीने विभागीय सहसंचालकांनी आदेश काढावेत.

४. हे आदेश, राज्य शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०१००७२१२२०११५००१ आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(वि.गो.चांदेकर)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) कुलसचिव, सर्व अकृषी विद्यापीठे, महाराष्ट्र राज्य,
२) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
३) सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य,
४) संबंधित संस्था,
५) निवड नस्ती (मशि-४)